# महाराष्ट्र शासन

**क्रमांक: बीसीएच-२०२२/प्र.क्र.१२४/शिक्षण-२**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२
दिनांक: २१ फेब्रुवारी,२०२३

**विषय:-** महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम,१८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतिगृहाच्या परिरक्षणासाठी अनुदाने या योजनेअंतर्गत लेखाशिर्ष २२२५ ०५३९,३१ सहायक अनुदाने वेतनेतर याअंतर्गत १००% तरतूद वितरीत करणेबाबत..

**वाचा** : १. वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दिनांक ४ एप्रिल, २०२२
२.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन ज्ञापन,समक्रमांक दिनांक २५.४.२०२२

**ज्ञापन :-**

महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम,१८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतिगृहाच्या परिरक्षणासाठी अनुदाने वेतनेतर या योजनेअंतर्गत लेखाशिर्ष २२२५ ०५३९, ३१ सहायक अनुदाने वेतनेतर या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रू.१४०.०० कोटी (अक्षरी रूपये एकशे चाळीस कोटी) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ४ एप्रिल,२०२२ च्या शासन परिपत्रकास अनुलक्षुन या योजनेअंतर्गत वित्त विभागाने रू. ६८.६० कोटी इतकी तरतूद वितरीत केलेली आहे.

२. आता,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने सादर केलेल्या प्रस्तावास अनुलक्षुन वित्त विभागाने अर्थसंकल्पीत तरतुदीच्या १०० टक्के प्रमाणात निधी वितरणास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार या योजनेअंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात १०० टक्के प्रमाणे म्हणजेच उर्वरीत अवितरीत असलेली रक्कम रू. ७१.४० कोटी वितरीत करण्यास या ज्ञापनाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

( रूपये लाखात )

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | अर्थ संकल्पीत तरतूद | संदर्भ क्र.१ अन्वये यापूर्वी वितरीत तरतूद | वित्त विभागाने सहमती दिल्या नुसार वितरीत करावयाची तरतूद | एकूण वितरीत होणारी तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम, १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतिगृहाच्या परिरक्षणासाठी अनुदाने या योजनेअंतर्गत लेखाशिर्ष २२२५ ०५३९, ३१सहायक अनुदाने वेतनेतर | १४०००.०० | ६८६०.०० | ७१४०.०० | १४०००.०० |

२. सदरील योजनेअंतर्गत मार्च,२०२३ पर्यंतची मानधनाची रक्कम प्राधान्याने वितरीत करून उर्वरीत बाबीसाठीचे प्रलंबित दायित्व तसेच न्यायालयीन निर्देश विचारात घेवून त्यानुसार निधी वितरीत व पूर्णपणे खर्ची होईल, याची सबंधित नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच, निधी वितरीत झाल्यावर त्याबाबतच्या आदेशासह प्रकरणी झालेल्या खर्चाचे प्रादेशिक विभागांतर्गत जिल्हानिहाय खर्च व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करावे.

३. उपरोक्त योजनेअंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील.तसेच,वित्तीय नियमावली,महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करून कोणतीही वित्तीय अनियममितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांची राहील.

४. सदर ज्ञापन हे वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. १०४/२०२३/व्यय-१४,दिनांक १०.२.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२११७३५४७९६२२ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a4735679 8e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C 78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2023.02.21 17:40:02 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. महालेखापाल,१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र,मुंबई / नागपूर
३. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई
५. संचालक,लेखा व कोषागारे, मुंबई
६. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण सर्व
७. जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद सर्व
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (शिक्षण-२).